**सिताबर्डी पो. स्टे. नागपूर शहर गु.र.क्र.६७६/२०१९ मधून उदभवणाऱ्या सर्व न्यायालयीन प्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे शासनाच्यावतीने न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. श्री. प्रविण चव्हाण यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- एसपीपी-१११९/प्र.क्र. ३३२/पोल-१०,**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ:-** १) शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०१९/यु.ओ.आर.६५/कार्या-१४, दिनांक १५.०२.२०२०

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७

**प्रस्तावना :-**

सिताबर्डी पो. स्टे. नागपूर शहर गु.र.क्र.६७६/२०१९ मधून उदभवणाऱ्या सर्व न्यायालयीन प्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रविण चव्हाण यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सिताबर्डी पो. स्टे. नागपूर शहर गु.र.क्र. ६७६/२०१९ मधून उदभवणाऱ्या सर्व खटल्याप्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर येथे शासनाच्यावतीने न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. प्रविण चव्हाण यांना, सदरहू सिताबर्डी पो. स्टे., नागपूर येथे दाखल गु.र.क्र. ६७६/२०१९ मधून उद्भवणारी सर्व न्याय प्रकरणे निकाली निघेपर्यंत, प्रतिदिन परिणामकारक सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे

**मा. विशेष मोक्का न्यायालय, नागपूर व मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर**

| | | |
|---|---|---|
| १) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | ४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त) |
| २) प्रवास खर्च | - | विमानाचे प्रवास भाडे (मुंबई-नागपूर /पुणे-नागपूर) |
| ३) निवास व्यवस्था | - | शासकीय विश्रामगृह |

२. ॲड. श्री. प्रविण चव्हाण यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान नियमित न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. प्रविण चव्हाण यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक " मागणी क्र. बी-१,२०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल- (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१३९११०३, दि. १२/०३/२०२० अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय क्रमांक:- विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम,दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०१०१९१७३९४४२९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.19 17:41:35 +05'30'

**( किशोर भालेराव )**
उप सचिव (विधि), गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, नागपूर शहर, नागपूर.
२. पोलीस सह आयुक्त,सिव्हिल लाईन्स्, नागपूर.
३. पोलीस उपायुक्त (गुन्हे शाखा), नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर-२,महाराष्ट्र राज्य.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
६. ॲड. श्री. प्रविण चव्हाण, एकदंत, प्लॉट-२३, एन-४- सेक्टर-एच, सिडको, औरंगाबाद.
७. विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- पोल-१०.